**राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात ५० ते १५० संगणक आसन क्षमता असणारे इ-वाचनालय व अभ्यासिका “बहुउद्देशिय संगणक केंद्र" स्थापन करण्याकरिता एकूण रु. २१९८.३३ लक्ष (२१.९८३३ कोटी) एवढी रक्कम वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: इगर्व्हे-१५२१/प्र.क्र.१३/संगणक**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-२८ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) Bid number GEM/२०२३/B/३९५०१२७, दि.१३.०९.२०२३.
२) समक्रमांकाचा शासन निर्णय दि. २७.१०.२०२३.
३) शासनाचे पत्र क्र. खरेदी-२०२३/प्र.क्र.११९/एसदी-६, दि. २७.१२.२०२३.
४) Contract No. GEMC-५११६८७७२८४३१०३७, दि. २८.१२.२०२३.
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांचे पत्र क्र.मप्राशिप /स्टार्स/ MCC/संगणक/२०२३/३५२, दि. ०१.०२.२०२४.
६) समक्रमांक दि. १२.०२.२०२४ रोजीचा शासन निर्णय.
७) समक्रमांक दि. १२.०३.२०२४ रोजीचे शासन शुद्धीपत्रक.

**प्रस्तावना:-**

राज्यातील शिक्षण क्षेत्रात जास्तीत जास्त तंत्रज्ञानाचा अधिकाधीक वापर होण्याकरीता तसेच ऑनलाईन शिक्षण, ऑनलाईन प्रशिक्षण ऑनलाईन मुल्यमापन या बाबींकरीता डिजीटल पायाभुत सुविधा निर्माण करण्याच्या हेतूने राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात ५० ते १५० संगणक आसन क्षमता असणारे इ-वाचनालय व अभ्यासिका “बहुउद्देशिय संगणक केंद्र" स्थापन करण्याकरिता व त्यासाठीच्या रु.६००९.३३ लक्ष इतक्या खर्चास संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. सदरच्या एकूण रु. ६००९.३३ लक्ष पैकी रु.४९९८.३३ लक्ष इतका खर्च मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०-सर्वसाधारण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२H४५४) ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षातून भागविण्यात येणार आहे व उर्वरित १०११.०० लक्ष निधी STAR (Strengthing Teaching Learing and Results for state Project) या प्रकल्पाच्या सन २०२३-२४ करीता मंजूर तरतुदीमधून भागविण्यात येणार आहे. उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार या प्रकल्पाच्या अंमलबजावणीची जबाबदारी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांच्यावर संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सोपविण्यात आली आहे.

३. त्यानुसार, राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांनी केलेल्या विनंतीनुसार राज्य स्तरावरून बहुउद्देशीय संगणक केंद्र (MCC) उभारणी करण्याकरीता संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये रु. २८००.०० लक्ष (२८ कोटी) इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेस (MPSP) वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता, सदर प्रकल्पास लागणारी उर्वरित रु. २१९८.३३ लक्ष (२१.९८३३ कोटी) एवढी रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य स्तरावरून बहुउद्देशीय संगणक केंद्र (MCC) उभारणी करण्याकरीता सद्य:स्थितीत उपलब्ध निधीनूसार रु. २१९८.३३ लक्ष (२१.९८३३ कोटी) इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेस (MPSP) वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक -ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२ H४५४) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ च्या उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी विभागातील सह सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**३.** हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग-२ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३४/व्यय-५, दिनांक २६.०३.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक दि. १२.०४.२०२३ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पुर्तता करीत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरीताच्या अटी व शर्ती या शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१६२७३४५१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.03.28 16:37:06 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र (SCERT), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) संचालक, प्राथमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) सह सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महालेखापाल(लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
१०) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२) कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती/संगणक कार्यासन.